राज्याच्या प्रत्येक जिल्हयात एक वार्षिक
उद्योग दिवस साजरा करणेबाबत.

# महराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,

**शासन निर्णय क्रमांक : लउधो-२०१३/प.क्र. २०२/उद्योग-७,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : २७ जानेवारी, २०१५.**

**वाचा:** उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उसं/जिउके/उद्योग दिवस/नवीन योजना प्रस्ताव/०१३/अे-६३५, दिनांक. ९.५.२०१३.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र राज्याचा समतोल औद्योगिक विकास घडविण्यासाठी व त्याद्वारे आर्थिक विकास साधण्यासाठी आणि नवीन उद्योग घटकांच्या स्थापनेस चालना देण्यासाठी व त्याद्वारे रोजगाराच्या भरीव संधी निर्माण होण्यासाठी “महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१३” जाहिर करण्यात आलेले आहे. सदर औद्योगिक धोरणानूसार उद्योगांना, विशेषत: सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना, त्यांची उत्पादने व क्षमता दाखविण्यासाठी सामाईक व्यासपीठ उपलब्ध करून देण्याकरिता राज्याच्या प्रत्येक जिल्हयात एक वार्षिक उद्योग दिवस साजरा करण्याबाबत जाहिर करण्यात आलेले आहे. प्रस्तुत धोरणानुसार खालील शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१३ च्या अनुषंगाने जिल्हयाची औद्योगिक क्षमता व औद्योगिक विकासासाठी येणाऱ्या संधी दाखविण्यासाठी व जिल्हयाच्या संपूर्ण उद्योग समुहास एका व्यासपिठावर आणण्यासाठी तसेच जिल्हयाची आर्थिक प्रगती करण्यासाठी आणि स्वयंरोजगाराच्या संधी व योजना उपलब्ध करून देता येणे शक्य व्हावे यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्हयात "दरवर्षी विश्वकर्मा जयंती दिनी" **उद्योग दिवस** साजरा करण्यात येईल.

२. सदर दिवशी पुढील स्वरुपाच्या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात यावे.

अ) जिल्हयातील सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांच्या उद्योजकांसाठी एकाच ठिकाणी त्यांची उत्पादने दृष्य स्वरूपात मांडणी व विक्रीसाठी प्रदर्शन भरविणे.

ब) उद्योग दिवसाच्या सोहळयात जिल्हा उद्योग केंद्रामार्फत कार्यशाळा व चर्चासत्रे आयोजित करणे.

३. राज्यामध्ये उद्योग क्षेत्रात उल्लेखनिय/विशेष कामगिरी करणाऱ्या सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योजकांना शासनामार्फत शासन निर्णय क्र. लउधो-२००५/(८३९२)/उद्योग-७, दि. १८.९.२००६ नुसार जिल्हा स्तरावर जिल्हा लघु उद्योग पुरस्कार दरवर्षी देण्यात येतो. यापुढे सदर पुरस्कार सोहळा दरवर्षी उद्योग दिनी साजरा करण्यात येईल.

४. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दिनांक २५.४.१९७८ अन्वये गठीत करण्यात आलेल्या संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा सल्लागार समिती अंतर्गत उद्योग दिवस साजरा करण्यासाठी जिल्हाधिकारी यांचेमार्फत उप समिती स्थापन करण्यात येईल. सदर उप समिती उद्योग दिवस सोहळयाचे नियोजन अंमलबजावणी, समन्वय व संनियंत्रण करेल.

५. उद्योग दिवस साजरा करण्यासाठी येणारा खर्च मागणी क्र. के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०२, लघु उद्योग, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१६), जिल्हा पातळीवरील लघुउद्योजकांना पुरस्कार देण्याची योजना (योजनेतर), (२८५१ १३९४) ०५ बक्षिसे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२७१२४८२९४९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2015.01.27 13:00:37 +05'30'

**(संजय देगांवकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री (सर्व) व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
५. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२.
८. सर्व जिल्हाधिकारी (उद्योग संचालनालयामार्फत)
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१२.सर्व उद्योग सह संचालक/ अधिक्षकीय उद्योग अधिकारी/कोकण विभाग/पुणे विभाग/नाशिक विभाग/अमरावती विभाग/ औरंगाबाद विभाग/ नागपूर विभाग. (उद्योग संचालनालयामार्फत)
१३.सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र. (उद्योग संचालनालयामार्फत).
१४.बहूजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई- ४०० ००१.
१५.भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ., बॅरॅक क्र. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई- ४०० ०२०.
१६.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन,एस.व्ही.पटेल रोड, मुंबई- ००४.
१७.भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई- ४०० ०१३.
१८. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, , दादर, मुंबई- ४०० ०२५.
१९.नॅशनलिस्ट काँग्रेस पाटी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जनमल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई- ०२१.
२०.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई- ४०० ०२८.
२१.नियोजन विभाग, का.१४६१, मंत्रालय, मुंबई.
२२. वित्त विभाग, व्यय-१६/अर्थ-१४, मंत्रालय, मुंबई
२३.विभागातील सर्व कार्यासने.
२४.कार्यासन अधिकारी, प्रशासन-१, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. निवड नस्ती, उद्योग-७, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

**********